“कौमी एकता सप्ताहाच्या” कालावधीत दिनांक २२ नोव्हेंबर, २०१८ हा दिवस निधी संकलित करण्याकरिता “ध्वजदिन” म्हणून पाळण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन
अल्पसंख्याक विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः कौएदि - २०१८/प्र.क्र.९३/का.८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : १३ नोव्हेंबर, २०१८

# शासन परिपत्रक

केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाने स्थापन केलेल्या राष्ट्रीय सांप्रदायिक सदभावना प्रतिष्ठान, नवी दिल्ली या संस्थेच्या वतीने दिनांक १९ नोव्हेंबर, २०१८ ते दिनांक २५ नोव्हेंबर, २०१८ या कालावधीत पाळण्यात येणाऱ्या कौमी एकता सप्ताहामध्ये **“सांप्रदायिक सदभावना मोहिम (Campaign) निधी संकलन सप्ताह”** साजरा करण्यात येणार आहे. दिनांक २२ नोव्हेंबर, २०१८ रोजी **“ध्वजदिन साजरा”** करण्यात येणार आहे. ध्वजदिनाचा निधी संकलित करण्याकरिता व संकलित केलेला निधी राष्ट्रीय सांप्रदायिक सदभावना प्रतिष्ठान, नवी दिल्ली यांच्याकडे सूपुर्द करण्याकरिता अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत खालील सूचना देण्यात येत आहेत :-

१) दिनांक २२ नोव्हेंबर, २०१८ या दिवशी सर्व शासकीय कार्यालये, विद्यालये, महाविद्यालये, सार्वजनिक उपक्रम, महामंडळे, सार्वजनिक संस्था आणि देणगीदार यांच्याकडून स्वेच्छेने निधी संकलित करण्यात यावा.

२) शासकीय कार्यालये, विद्यालये, महाविद्यालये, सार्वजनिक उपक्रम, महामंडळे या कार्यालयातील कर्मचाऱ्यांकडून सदर निधी डब्यांतून संकलित करण्यात यावा. खाजगी संस्था वा देणगीदार अथवा करदाते यांना सदर निधीसाठी रक्कम दान म्हणून दयावयाची असेल तर त्यांच्याकडून अशी रक्कम धनादेशाव्दारे स्विकारण्यात यावी. धनादेशाव्दारे स्विकारलेल्या रकमेची पोच पावती त्यांना देण्यात यावी (पोच पावतीचा नमुना सोबत जोडला आहे).

३) खाजगी संस्था वा देणगीदार अथवा करदाते यांच्याकडून रक्कम धनादेशाव्दारे स्विकारताना धनादेश सचिव, राष्ट्रीय सांप्रदायिक सदभावना प्रतिष्ठाण, नवी दिल्ली या नांवाने घेण्यात यावा.

४) निधी संकलित करण्यासाठी प्रत्येक जिल्हयातील जिल्हाधिकाऱ्यांनी व मंत्रालयीन विभागांनी माजी सैनिक कल्याण मंडळे, रेड क्रॉस सोसायटी अथवा तत्सम संघटना यांच्याकडून डबे उपलब्ध करुन घ्यावेत व निधी संकलित करण्याची कार्यवाही करावी.

५) निधी संकलित केलेले डबे सचिव, राष्ट्रीय सांप्रदायिक सदभावना प्रतिष्ठान, नवी दिल्ली यांचेकडे पाठविणे अडचणीचे, गैरसोयीचे व जोखमीचे असते. म्हणून डब्यात संकलित केलेला निधी हा कार्यालयातील जबाबदार अधिकाऱ्यासमोर मोजून त्याचा डिमांड ड्राफ्ट तयार करुन तो व इतर संस्था, देणगीदार यांच्याकडून आलेले धनादेश सचिव, राष्ट्रीय सांप्रदायिक सदभावना प्रतिष्ठान, सी विंग, ९ वा मजला, लोकनायक भवन, खान मार्केट, नवी दिल्ली - ११० ००३ यांच्याकडे नोदंणी टपालाव्दारे परस्पर पाठवावा किंवा संकलित केलेला निधी खालील बॅक खात्यावर परस्पर हस्तांतर करण्यात यावा व त्याचा अनुपालन अहवाल या कार्यालयात दि.१५ डिसेंबर, २०१८ पर्यत न चुकता पाठवावा.

| | |
|---|---|
| Name of Bank | Central Bank of India |
| Address of Bank | Khan Market, New Delhi- 110003 |
| Name of A/C holder | National Foundation for Communal Harmony |
| Account Number | 1065439058 |
| NEFT/IFSC/RTGS | CBIN 0280310 |

Or

| | |
|---|---|
| Name of Bank | State Bank of India |
| Address of Bank | Nirman Bhavan, Maulana Azad Road, New Delhi- 110011 |
| Name of A/C holder | National Foundation for Communal Harmony |
| Account Number | 10569548047 |
| NEFT/IFSC/RTGS | SBIN 0000583 |

Or

| | |
|---|---|
| Name of Bank | Bank of India |
| Address of Bank | Khan Market, New Delhi- 110003 |
| Name of A/C holder | National Foundation for Communal Harmony |
| Account Number | 600710110006040 |
| NEFT/IFSC/RTGS | BKID 0006007 |

राष्ट्रीय सांप्रदायिक सदभावना प्रतिष्ठान, नवी दिल्ली या संस्थेच्या वतीने दिनांक २२ नोव्हेंबर, २०१८ रोजी संकलित करावयाच्या निधीसाठी महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ च्या नियम ११ मधील तरतूद शिथिल करुन निधी संकलित करण्यासाठी शासकीय कर्मचाऱ्यांस मुभा देण्यात येत आहे.

सर्व जिल्हाधिकारी आणि सर्व मंत्रालयीन विभागांचे सचिव यांना उपरोक्त सूचनांप्रमाणे उचित कार्यवाही करुन जास्तीत जास्त निधी संकलित करण्याचा प्रयत्न करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक २०१८१११४११४६०४६३१४ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M. Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, 2.5.4.45=032100CD9D66225CED8BAE27E0E1249D39EC14A54419D0A13504B49333B23F92B58199, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2018.11.14 11:52:53 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई,
६. सर्व विभागीय आयुक्त,
७. सर्व जिल्हाधिकारी,
८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
९. पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य,
१०. पोलिस महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य,
११. सर्व पोलिस आयुक्त,
१२. सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक,
१३. अध्यक्ष/ सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई
१४. अध्यक्ष/ कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई
१५. मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व महामंडळे, मंडळे आणि सार्वजनिक यांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, व्यवस्थापकीय संचालक/प्रशासकीय अधिकारी
१६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
१७. कक्ष अधिकारी, कार्यासन- २९, सामान्य प्रशासन अधिकारी, मंत्रालय, मुंबई (मंत्रालयात कार्यक्रम आयोजित करण्याच्या अनुषंगाने आवश्यक त्या कार्यवाहीसाठी)
१८. कक्ष अधिकारी, माहिती व तंत्रज्ञान कक्ष, मंत्रालय, मुंबई (२ प्रती संकेतस्थळावर प्रसिध्दीसाठी)
१९. निवड नस्ती (का-८).

**राष्ट्रीय सांप्रदायिक सदभावना प्रतिष्ठान, नवी दिल्ली**
**दिनांक २२ नोव्हेंबर, २०१८ ध्वजदिन निधी**

ठिकाण :- दिनांक :-

श्री/श्रीमती ________________________________यांचे

कडून

रुपये ______________________

(अक्षरी) _________________________________ध्वजदिन

निधीस मदत म्हणून मिळाले.

वसूल करणाऱ्याची सही व शिक्का

आयकर कायदा १९६१ मधील कलम ८० जी. अन्वये दिलेली रक्कम ही आयकरातून मुक्त करण्यात आली आहे.

**टिप :- सदर पोच पावतीवर रबरी शिक्का उमटविण्यात यावा.**